प्रशासकीय मान्यता
खामगाव, जिल्हा बुलढाणा येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ मजला + ४ मजले) (१२ कोर्ट हॉल) बांधण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन निर्णय क्र. सीसीबी-११२३/प्र.क्र.२४३/का-१३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ जुलै, २०२३

पहा :-

मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी(डब्ल्यू) ६०६०/ १९८४ (१९)/३८१/८०७८, दिनाक १० फेब्रुवारी, २०२३.

प्रस्तावना :-

खामगाव, जिल्हा बुलढाणा येथील जुनी न्यायालयीन इमारत पाडून तेथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ मजला + ४ मजले) (१२ कोर्ट हॉल + पोक्सो कोर्ट) बांधण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर करण्यात आलेला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

खामगाव, जिल्हा बुलढाणा येथील जुनी न्यायालयीन इमारत पाडून तेथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ मजला + ४ मजले) (१२ कोर्ट हॉल + पोक्सो कोर्ट) बांधकामासाठी रु.८८.९४ कोटी (रु.अठ्ठयाऐंशी कोटी चौऱ्याण्णव लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रुपयात |
|---|---|---|
| अ) | आवश्यक बाबी | |
| १. | मूळ इमारत बांधकाम | ४८,१२,२८,४४०.०० |
| २. | रेन वॉटर हार्वेस्टींग | २०,००,०००.०० |
| ३. | फर्निचर | ६,०१,५५,०००.०० |
| ४. | पाणी पुरवठा व मल:निस्सारण | २,४०,६१,४२२.०० |
| ५. | अंतर्गत विद्युतिकरण | २,४०,६१,४२२.०० |
| ६. | बाह्य विद्युतिकरण | २,८८,७३,७०६.०० |
| ७. | अग्नीशमन यंत्रणा | ७०,००,०००.०० |
| ब) | संकिर्ण बाबी | |
| ८. | संरक्षक भिंत | ९६,००,०००.०० |
| ९. | अंतर्गत रस्ते | ८०,००,०००.०० |
| १०. | माती परिक्षण व सविस्तर लॅन्ड सर्व्हे | ५,००,०००.०० |
| ११. | सी सी ड्रेन | ३५,००,०००.०० |
| १२. | भू सपाटीकरण | ५,००,०००.०० |
| १३. | ग्राऊंड डेव्हलपमेंट | ५,००,०००.०० |

| | | |
|---|---|---|
| १४. | वाहनतळ | १५,००,०००.०० |
| **क)** | **वैकल्पिक बाबी** | |
| १५ | जमीनीखालील पाण्याची टाकी | १०,००,०००.०० |
| १६. | मुख्य पाणीसाठा आणि पंप हाऊस | १५,००,०००.०० |
| १७. | वातानुकूलीन यंत्रणा | २,००,००,०००.०० |
| १८. | उद्वाहन | २,४०,००,०००.०० |
| १९. | फ्लॅग पोस्ट | ३,००,०००.०० |
| २०. | ए बी रुम, पंप, जनरेटर | २०,००,०००.०० |
| २१. | सीसीटीव्ही | १५,००,०००.०० |
| **ड)** | **इतर तरतूदी** | |
| २२. | आकस्मिक खर्च (४%) | १,९२,४९,१३८.०० |
| २३. | वस्तू व सेवा कर (१८%) | १२,६३,२०,३९८.०० |
| २४. | भाववाढ (५%) | ३,५०,८९,१००.०० |
| २५. | कामगार विमा (०.५%) | ७०,१७,८००.०० |
| | **एकूण** | **८८,९४,५६,४२६.००** |
| | **म्हणजेच एकूण** | **रू.८८.९४ कोटी** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा.प्रमुख मुख्य जिल्हा व सत्र न्यायाधिश, बुलढाणा यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) सदर कामाची निविदा काढताना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

५) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था / प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्याता आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, या दृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

९) अंदाजपत्रकीय कामात बदल होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नये.

११) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास, याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागातील तसेच अन्य संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी "मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम-कार्यक्रमांतर्गत-(०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम),५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४६/२०२३/ इमा-२, दिनांक ७ मार्च, २०२३, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१२४/१४४३, दिनांक १६ मार्च, २०२३ आणि मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार सचिव समितीच्या दिनांक ११ जुलै, २०२३ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७१७१२०५४०५३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.07.17 12:08:25 +05'30'

**( विलास व्ही. गायकवाड )**
**विधि सल्लागार- नि- सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
४) मा. प्रबंधक बी (डब्ल्यू ) शाखा, मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५) मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, बुलढाणा

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.
८) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, खामगांव, जिल्हा बुलढाणा. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०) सहायक अभियंता श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, खामगांव, जिल्हा बुलढाणा.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) नियोजन विभाग-१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन-१३).